**महाराष्ट्र दिन, दि. १ मे, २०१८ रोजी मा. मुख्यमंत्री यांच्या हस्ते डिजिटल स्वाक्षरीयुक्त गा.न.नं. ७/१२ च्या लोकार्पण सोहळयास आलेल्या खर्चाबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : राभूअ -२०१८/प्र.क्र.१६७/ल-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
तारीख : ३१ जानेवारी, २०१९

**प्रस्तावना-**

महाराष्ट्र राज्यातील गा.न.नं. ७/१२ संगणकीकृत करण्याची कार्यवाही पूर्ण करण्यात आली असून, सदर डिजिटल सिग्नेचरयुक्त गा.न.नं. ७/१२ राज्याच्या नागरीकांना वितरीत करण्याचा शासनाचा महत्वाकांक्षी कार्यक्रम आहे. त्यानुसार प्रस्तुत कार्यक्रमाच्या व्यापक प्रसिध्दीसाठी (वृत्तपत्रे, दुरचित्रवाणी) रू. १.२३ कोटी एवढा खर्च करण्यास मा. मंत्री (महसूल) यांची मान्यता प्राप्त झाली आहे. डिजिटल स्वाक्षरीयुक्त गा.न.नं. ७/१२ चे अन्यन्यसाधारण महत्व लक्षात घेऊन शासनाच्या या महत्वाकांक्षी कार्यक्रमाचे लोकार्पण मा. मुख्यमंत्री महोदयांच्या हस्ते महाराष्ट्र दिनाचे औचित्य साधून दि. १ मे, २०१८ रोजी मर्यादीत स्वरूपात सह्याद्री अतिथीगृह, मुंबई येथे आयोजित करण्यात आले होते. या लोकार्पण सोहळ्याचे आयोजन (Event Management) मे. कोटिल्य मल्टीक्रीयेशन्स लि. या संस्थेने केले असून सदर आयोजनासाठी रू. २.९५ लक्ष इतक्या रक्कमेच्या देयकास मान्यतेची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याबाबत शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय-**

महाराष्ट्र दिन १ मे, २०१८ रोजी सह्याद्री अतिथीगृह, मुंबई येथे डिजिटल संगणीकृत गा.न.न. ७/१२ चा लोकार्पण सोहळा आयोजन (Event Management) करण्यास आलेल्या रू. २.९५ लक्ष (रू. दोन लक्ष पंच्चाण्णव हजार मात्र) एवढया खर्चास मान्यता देण्यात येत आहे.

२. प्रस्तुत खर्च लेखाशीर्ष २०५२०२१२, उद्दिष्ट-१३- कार्यालयीन खर्च या लेखाशीर्षाखाली आर्थिक वर्ष सन २०१८-१९ मध्ये उपलब्ध अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०२०११७४१०६३७१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Hemant Sudhakar Dange

Digitally signed by Hemant Sudhakar Dange
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2fbeecf30dbdfaa940e8f2828e95f9d4887d464ef7d572a989b5f7bced6665be, cn=Hemant Sudhakar Dange
Date: 2019.02.01 17:49:35 +05'30'

**( हेमंत डांगे )**
**अवर सचिव,**
**महसूल व वन विभाग**

**प्रति,**

१. प्रधान सचिव (माहिती व तंत्रज्ञान), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय,मुंबई

२. जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख, (महाराष्ट्र राज्य) पुणे
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र १, मुंबई
४. अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई
५. वित्त विभाग, कार्यासन व्यय १०/ अर्थसंकल्प ६, मंत्रालय, मुंबई
६. कार्यासन ब१/ब२ महसुल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
७. निवडनस्ती कार्यासन ल-१, महसुल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.